**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या अनुषंगाने केंद्र शासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिद्ध केलेल्या यादीनुसार लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कार्यालयामधील गट अ, ब, क आणि ड मधील पदांवर शारीरिकदृष्ट्या अपंगांसाठी सुयोग्य पदे निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एलपीएल १०१०/५२७/प्र.क्र. १५४/१५,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : १३ जानेवारी २०११**

**वाचा :** १) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ (१९९६ चा क्रमांक १),

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही - १०९७ / प्र.क्र.१२ / १६ - अ, दिनांक २ मे, १९९८,

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९९ / प्र.क्र. ३७/ ९९/ १६ अ दिनांक ५ मार्च २००२

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल १००४ / प्र.क्र. ५२ / २००४ / १५, दिनांक ५ सप्टेंबर २००५

५) शासन शुद्धीपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल १००४ / प्र.क्र. ५२ / २००४ / १५, दिनांक ३ ऑक्टोबर २००६

६) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक न्यायाप्र - २००९ / प्र.क्र.५ / सुधार - ३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावना** :

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनिमय, १९९५ (१९९६ चा क्रमांक १) हा अधिनियम दिनांक ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमास अनुसरुन शासनाने संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २ मे, १९९८ च्या शासन परिपत्रकान्वये शासन सेवेत अपंग व्यक्तींना सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याबाबतच्या सूचना सर्व प्रशासकीय विभागांना दिल्या आहेत. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील कलम ३२ व ३३ मधील तरतुदीस अनुसरुन संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक ५ सप्टेंबर २००५ च्या शासन निर्णयान्वये लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कार्यालया मधील गट अ, ब, क आणि ड या संवर्गात सरळसेवा भरतीमध्ये

अपंगांसाठी सुयोग्य पदे निश्चित करण्यात आली होती. यासंदर्भात केंद्र शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतुदींस अनुसरुन त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तिंसाठी पदे निश्चित करुन त्यांची यादी प्रसिद्ध केली आहे. सदर यादीनुसार राज्य शासनाच्या अखत्यारीतील शासकीय व निमशासकीय आस्थापनेवरील जी पदे समान आहेत ती पदे संबंधीत मंत्रालयीन विभागांनी अपंगांसाठी सुयोग्य पदे निश्चित करण्यासाठी आदेश निर्गमित करावेत, अशा सूचना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्यानुसार, लोकआयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील गट अ, ब, क आणि ड या संवर्गातील पदांना निश्चित करण्यात आलेल्या अपंगत्वाच्या प्रकारात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार, संदर्भाधिन अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल १००४ / प्र.क्र. ५२ / २००४ / १५, दिनांक ५ सप्टेंबर २००५ व शासन शुद्धीपत्रक दिनांक ०३.१०.२००६ **याद्वारे अधिक्रमित करुन पुढील प्रमाणे सुधारित शासन निर्णय** निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

१. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार केंद्र शासनाने ज्या यादीन्वये त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तिंसाठी निश्चित केलेली आहेत, त्या यादीशी तुलना करुन लोकआयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या आस्थापनेवरील गट अ, ब, क आणि ड या संवर्गातील सरळसेवा नियुक्तीने भरावयाच्या पदांसाठी (केंद्र शासनाच्या यादीतील समान पदे विचारात घेवून) खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपंगांसाठी पदे सुनिश्चित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | शारिरीक योग्यता | सुयोग्य पदासाठी अपंगत्वाचा संवर्ग |
|---|---|---|---|
| १ | प्रबंधक | S.ST.W.SE.H.C. | OA.OL.B.LV.HH. |
| २ | अतिरिक्त प्रबंधक | S.ST.SE.W.H.C. | OA.OL.B.LV.HH. |
| ३ | सहायक प्रबंधक | S.ST.SE.W.H.C. | OA.OL.B.LV.HH. |
| ४ | सचिव | S.ST.BN.MF.RW. | OL.BL.OA.B. LV. |
| ५ | वरिष्ठ स्वीय सहायक | S.ST.BN.MF.RW. | OL.BL.OA.B.LV. |
| ६ | कक्ष अधिकारी | S.RW.SE.MW.C. | OL.OA.BL.HH.B.LV. |
| ७ | लघु लेखक उच्च श्रेणी | S.ST.BN.MF.RW | OL.BL.OA.B.LV. |
| ८ | लघु टंकलेखक | S.ST.W.L.MF.SE.RW.H.C. | OA.OL.BL.OAL.B.LV. |
| ९ | सहायक | S.ST.W.RW.H.C. | OA.OL.BL.OAL.B.LV.HH. |
| १० | लेखापाल तथा रोखपाल | S.W.MF.SE.RW.H.C. | OA.BL.OL.MW. |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | ग्रंथपाल | S.BN.MF.SE.RW.C. | OA.OL.OAL.BL.HH. |
| १२ | अनुवादक | S.SE.RW. | OA.OL.OAL.BL.BLV.HH. |
| १३ | लिपिक / देयक लिपिक | S.ST.W.MF.SE.RW.H. | OA.OL.OAL.BL.B.LV.HH. |
| १४ | लिपिक - टंकलेखक | S.ST.W.L.MF.SE.RW.H.C. | OA.OL.BL.OAL.B.LV. |
| १५ | टंकलेखक | S.ST.W.L.MF.SE.RW.H.C. | OA.OL.BL.OAL.B.LV. |
| १६ | वाहनचालक | अपात्र | अपात्र |
| १७ | चोपदार | S.ST.W.PP.L.KC.SE.RW.C.MF. | OA.OL.HH.LV.B. |
| १८ | नाईक | S.ST.W.PP.L.KC.SE.RW.C.MF. | OA.OL.HH.LV.B. |
| १९ | झेरॉक्स यंत्र चालक | S.ST.W.MF.BN.SE.RW.H.C. | OL.BL.HH. |
| २० | शिपाई | S.ST.W.PP.L.KC.SE.RW.C.MF. | OA.OL.HH.LV.B. |
| २१ | पहारेकरी तथा सफाईगार | ST.W.SE. | OL.BL.HH. |

[ ABBREVATIONS USED :- S - Seating, BN - Bending, SE - Seeing, RW - Reading & Writing, C - Communication, MF - Manipulation by fingures, PP - Pulling & pushing, L - Lifting, KC - Kneeling & Cheacking, ST - Standing, W - Walking, BLA - Both Legs & Arms, BA - Both Arms, OL - One Leg, BL - Both Leg, OA - One Arm, OAL - One Arm & One Leg, B - Blind, LV - Low Vision, H - Hearing, MW - Muscular Weakness, OH - Orthopaedically Handicapped, CP - Cerebral Palsy, LC - Leprosy Cured, VH - Visually Handicapped, HH - Hearing Handicapped,]

२. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ या अधिनियमातील कलम ३२ व ३३ अनुसार लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या आस्थापनेवरील गट अ, ब, क आणि ड या संवर्गातील पदांवरील सरळसेवा भरतीमध्ये किमान ४० % अपंगत्व असलेल्या अंध, कर्णबधीर व अस्थिव्यंग या अपंग व्यक्तीसाठी प्रत्येकी १% याप्रमाणे ३% आरक्षण लागू राहिल. तसेच, गट क व गट ड मध्ये संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णय दिनांक ५ मार्च २००२ अन्वये पदोन्नतीमध्ये आरक्षण लागू राहील.

३. गट "क" मधील "वाहनचालक" या पदाची कर्तव्ये व जबाबदारी लक्षात घेता, "वाहनचालक" या पदास अपंग प्रवर्गाचे आरक्षण लागू करण्यापासून सूट देण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भाधीन अनुक्रमांक ६ येथील शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक न्यायाप्र - २००९ / प्र.क्र.५ / सुधार - ३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१० अन्वये देण्यात आलेल्या सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.    सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( बा. वि. निकम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
सामान्य प्रशासन विभागातील अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
आयुक्त, अपंग कल्याण, ३ , चर्च रोड, पुणे
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, (पत्राने)
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) मुंबई.
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) नागपूर.
वित्त विभाग, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १६ - अ, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / सुधार - ३, मंत्रालय, मुंबई
सामान्य प्रशासन विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.

*****

संकेतांक क्र: 20110114164712001